विभागीय माहिती कार्यालय, नाशिक व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील कर्मचाऱ्यांनी दि.११.११.२००९ ते दि.२६.११.२००९ पर्यंत केलेल्या काम बंद आदोलनाचा कालावधी नियमित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. माजम २०१०/१३३५/प्र.क्र.१३०/३४-अ,**
**मंत्रालय, मुंबई.**
**दिनांक : २६ ऑक्टोंबर, २०१०**

**संदर्भ :-** महासंचालनालयाचे क्र.प्रविस्था-३ (२०१०)/का.१,३५९, दि.११ फेब्रुवारी, २०१० चे पत्र.

**प्रस्तावना**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या विभागीय माहिती कार्यालय, नाशिक यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील कर्मचाऱ्यांनी दि. ११.११.२००९ ते दि. २६.११.२००९ पर्यंत काम बंद आंदोलन केले होते. जे कर्मचारी काम बंद आदोलनात सहभागी झाले होते त्यांची अनुपस्थिती कशी नियमित करावी, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक -**

उपरोक्त संदर्भात नमूद करण्यात येते की, दि. ११.११.२००९ ते दि. २६.११.२००९ या कालावधीत अनुपस्थित राहुन काम बंद आंदोलनात सहभागी झालेल्या कर्मचाऱ्यांची अनुपस्थिती महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम ६३ प्रमाणे असाधारण रजा (विना वेतन, विना भत्ते) म्हणून नियमित करुन असाधारण रजेचा कालावधी शासन निर्णय, वित्त विभाग क्र.सेनिवे १००१/२९/सेवा-४, दि. १५.१.२००१ च्या आदेशास अपवाद करुन सेवेतील खंड न समजता निवृत्ती वेतनासाठी अर्हताकारी सेवा म्हणून ग्राह्य धरण्यास एक विशेष बाब म्हणून नियमित करण्यात यावी.

२. हे परिपत्रक, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०१०/७८/१६-अ, दि.२.३.२०१० व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३१/सेवा-६, दि. २९.६.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. हे परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२०१०१०२६२०४६२६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(कुं. नं. घाटगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई,
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
५. संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. विभागीय माहिती कार्यालय, नाशिक,
७. जिल्हा माहिती कार्यालय, नाशिक, धुळे, अहमदनगर, नंदुरबार,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, धुळे, अहमदनगर, नंदुरबार,
**९. निवडनस्ती/का.३४-अ.**